कोविड-१९ च्या आजाराच्या उपचारात्मक व प्रतिबंधात्मक उपायोजनांकरिता वैद्यकीय साहित्य व उपकरणे इ. आवश्यक बाबींची सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत (लेखाशिर्ष २२१०४२८६) २१-पुरवठा व सामुग्री अंतर्गत हाफकीन महामंडळाकडे वर्ग केलेल्या निधीतुन रु.६,०२,६५,५७२/- इतक्या रकमेची खरेदी निविदा प्रक्रियेद्वारे करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२०/प्र.क्र.६०/आरोग्य-८**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १६ मार्च , २०२२ .

**वाचा :-**

१) सहसंचालक, आरोग्य सेवा,(हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग) पुणे-१ यांचे पत्र क्र. संआसे/संचालक कक्ष/कोरोना प्रतिबंधक साहित्य सामुग्री/खरेदी/१०१३५-३८/२०२१ दि.०७.०७.२०२१

२) सहसंचालक, आरोग्य सेवा,(हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग) पुणे-१ यांचे पत्र क्र. संआसे/संचालक कक्ष/कोरोना प्रतिबंधक साहित्य सामुग्री / खरेदी/सुधारीत प्रशासकीय मान्यता/मुददे खुलासा/४९३०-३२/२०२२ दि.०२.०३.२०२२

३) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडील दिनांक ०२.०७.२०२१ रोजीची मान्य टिप्पणी.

**प्रस्तावना:-**

सहसंचालक, आरोग्य सेवा,(हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग) पुणे-१ कार्यालय यांनी त्यांच्या दिनांक ०७.०७.२०२१ व दि.०२.०३.२०२२ च्या प्रस्तावात नमूद केल्यानूसार , कोविड-१९ च्या आजाराच्या उपचारात्मक व प्रतिबंधात्मक उपायोजनांकरिता खास बाब म्हणून वैद्यकीय साहित्य व उपकरणे इ. आवश्यक बाबींची सन २०२०-२१ या वर्षाकरिता साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत (लेखाशिर्ष २२१०४२८६) २१-पुरवठा व सामुग्री अंतर्गत खरेदी करण्यासाठी हाफकीन महामंडळाकडे वर्ग केलेल्या निधीतून रु.६,०२,६५,५७२/- इतक्या रकमेचा खरेदीवरील खर्च भागविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

कोविड-१९ च्या आजाराच्या उपचारात्मक व प्रतिबंधात्मक उपायोजनांकरिता खास बाब म्हणून वैद्यकीय साहित्य व उपकरणे इ. आवश्यक बाबींची सन २०२०-२१ या वर्षाकरिता साथरोग नियंत्रण

कार्यक्रमांतर्गत (लेखाशिर्ष २२१०४२८६) २१-पुरवठा व सामुग्री अंतर्गत हाफकीन महामंडळाकडे वर्ग केलेल्या निधीतून रु.६,०२,६५,५७२/- इतक्या रकमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदर साहित्य खरेदीसाठी अंदाजित रक्कम रु. ६,०२,६५,५७२/- लक्ष इतका खर्च अपेक्षित असून सदरचा खर्च सन २०२०-२१ या वर्षाकरिता साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत (लेखाशिर्ष २२१०४२८६) खाली २१-पुरवठा व सामुग्री अंतर्गत हाफकीन महामंडळाकडे वर्ग केलेल्या निधीतून रु. ६,०२,६५,५७२/- इतका खर्च भागविण्यात येणार आहे.

## विवरणपत्र
## अ-अनुदानाचा तपशिल

(रक्कम रुपयांत)

| Sr. No. | Name of Item | Rate per Unit | Approx. Quantity to be Procured (Nos.) | Amount of Purchase Order (Rs.) | Budget Source |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Multi para Momitor | 1,26,302 | 46 | **58,09,892** | लेखशिर्षा खालील सन २०२०-२१ संक्षिप्त देयकावर वर्ग केलेल्या निधीतील शिल्लक असलेल्या निधीतुन भागविण्यात येणार आहे. |
| 2 | Adult and paediatric Ventilator | 11,13,153 | 46 | **5,12,05,038** | |
| 3 | Flower beds | 17,857 | 46 | **8,21,422** | |
| 4 | HIV Kit(PPE) kit | 160 | 11500 | **18,40,000** | |
| 5 | Diposablen-95 mask | 17.33 | 34000 | **5,89,220** | |
| **Total Amount Rupees** | | | | **6,02,65,572** | |

## ब- प्रस्तावित खरेदीचा तपशिल

(रक्कम रुपयांत)

| | Name of Item | Rate per Unit | Approx. Quantity to be Procured (Nos.) | Amount of Purchase Order (Rs.) |
|---|---|---|---|---|
| 1 | Multi para Momitor | 1,26,302/- | 46 | **58,09,892/-** |
| 2 | Adult and paediatric Ventilator | 11,13,153/- | 46 | **5,12,05,038/-** |
| 3 | Flower beds | 17,857/- | 46 | **8,21,422/-** |
| 4 | HIV Kit(PPE) kit | 160/- | 11500 | **18,40,000/-** |
| 5 | Diposablen-95 mask | 17.33/- | 34000 | **5,89,220/-** |
| **Total Amount Rupees** | | | | **6,02,65,572/-** |

०२. वरील प्रस्तावाच्या अनुषंगाने कोविड-१९ च्या आजाराच्या उपचारात्मक व प्रतिबंधात्मक उपायोजनांकरिता खास बाब म्हणून वैद्यकीय साहित्या व उपकरणे इ. आवश्यक बाबींची सन २०२०-२१ या वर्षाकरिता साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत (लेखाशिर्ष २२१०४२८६) २१-पुरवठा व सामुग्री अंतर्गत खरेदी करण्यासाठी रु.६,०२,६५,५७२/- इतक्या रकमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावासाठी सादर करावयाची प्रमाणपत्रे (परिशिष्ट-अ) व विनियोग प्रमाणपत्र प्रमाणित केले आहे तसेच सदरहू खरेदी करण्याच्या प्रस्तावास आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी त्यांच्या दिनांक ०२.०७.२०२१ च्या टिप्पणीद्वारे मान्यता दिलेली आहे.

०३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानूसार खालील अटींच्या अधीन राहून प्रस्तावास मान्यता देण्यात यावी, असे प्रस्तावित आहे.

१) सदरहू वैद्यकीय साहित्य व उपकरणे औषधांची आवश्यकता खातरजमा/मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू साहित्य सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. तसेच प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) तसेच सदर साहित्य खरेदीसाठी अंदाजित रक्कम रु. ६,०२,६५,५७२/- लक्ष इतका खर्च अपेक्षित असून सदरचा खर्च सन २०२०२-१ या वर्षाकरिता साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत लेखाशिर्ष) (२२१०४२८६खाली -२१पुरवठा व सामुग्री अंतर्गत कोविड प्रतिबंधक औषधे व साहित्या सामुग्री खरेदी करिता रु. ३९४,४५,६९,८०५/- इतके संक्षिप्त देयका व्दारे वर्ग करण्यात आले आहे. सदर वर्ग करण्यात आलेल्या अनुदानामधिल शिल्लक असलेल्या रक्कमेमधुन ६,०२,६५,५७२/- इतका खर्च भागविण्यात यावा . सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी - २०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै,२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

**०४.** उपरोक्त परिच्छेद क्र.०३ मधील अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी, आरोग्य सेवा संचालनालय व सहसंचालक, आरोग्य सेवा,(हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग) पुणे-१ यांची राहील.

**०५.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१६१५४८०७९७१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.03.16 16:42:44 +05'30'

**( वि.ल.लहाने)**
**सह सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि.परेल,मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई,पुणे.
४) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
६) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
११) अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)